# यूलीया द्रूनिना
# आलीस्का

अनुवादः अनिल हवालदार



चित्रेः वेनिआमीन कोस्तीत्सीन




रादुगा प्रकाशन
मॉस्को




लोकवाङ्‌मय गृह प्रा. लि.
मुंबई



१९४४ सालाच्या शरदाच्या मोसमात एस्तोनियात ही गोष्ट घडली होती. तेव्हा नाझी जर्मनीविरुद्ध सोविएत संघाचे युद्ध चालू होते.

स्वयंचलित तोफखान्याच्या रेजिमेंटची नर्स ह्या नात्याने आघाडीच्या फौजांबरोबर मी होते. आमची वैद्यकीय पथकाची मोटार खूप मागे कुठेतरी अडकली होती, तिच्याशी

माझा संपर्क तुटला होता आणि माझ्याजवळच्या बँडेजांचा साठा वेगाने संपत चालला होता. चढाईत नेहमीच खूप लोक घायाळ होतात.

एके दिवशी आम्ही नुकत्याच काबीज केलेल्या खेड्यात एक म्हातारी माझ्यापाशी आली. तिच्या हडकुळया हातांमध्ये तिने जोरदार कलकलाटणारी एक कोंबडी धरली होती. त्या एस्तोनियन बाईला रशियन बोलता येत नव्हते, पण शब्दाविना सर्व स्पष्ट होते: कोंबडीचा एक पाय मोडला होता – अर्थात लढाईच्या धुमाळीत.

म्हातारीची मूक विनंती मला विचित्र वाटली नाही. वेदना केवळ माणसांची मक्तेदारी आहे असे मानणाऱ्यांपैकी मी नव्हे.

पण माझ्या साथीदारांना काय वाटेल?

माझ्यापाशी बँडेजांचा तुटवडा होता हे म्हातारीला समजावून सांगायचा मी प्रयत्न केला, पण ती मुकाटपणे कोंबडीला माझ्या हातांमध्ये कोंबत राहिली.

एव्हाना आमच्याभोवती चौकस सैनिकांचा गराडा पडला होता. अचानक एका वयस्क सैनिकाचा करडा आवाज माझ्या कानी पडला:

"काय ग मुली, मुक्या प्राण्याची तुला दया येत नाही?"

वयस्क सैनिकाला एका तरुणाने पुष्टी दिली:

"ही शहरची माणसं सगळी तशीच. त्यांना समजच नाही!"

आणि पाठोपाठ कोरसमध्ये निषेध उमटले. काय काय शब्द मला ऐकावे लागले! त्यांचा पुनरुच्चार न करणे इष्ट...

एका थट्टेखोराने मात्र सुचविले की, "जखमी" कोंबडीचे सार चांगले होईल; पण त्याच्यावर बाकीचे एवढे संतापले, की तो पटकन गप्प झाला.

मी वैद्यकीय थैली उघडली. कुणीतरी लाकडाचे दोन ढलपे तासून माझ्यापाशी दिले आणि वैद्यकशास्त्राच्या पूर्ण नियमांनुसार कोंबडीच्या मोडक्या पायाला ते ढलपे बांधले.

अशा रीतीने युद्धआघाडीवरील सैनिकांनी मला माणुसकीचा प्रत्यक्ष धडा दिला – वस्तुतः ह्या माणसांच्या सर्व "भावना" युद्धाने नष्ट केल्या असाव्यात असे वाटले असते ...

ह्या धड्याची मला नेहमी आठवण राहिलीय, आत्तासुद्धा मला तो आठवतोय, जेव्हा आलीस्काशी माझी पहिली भेट कशी झाली ह्याबद्दल मी लिहितेय. तिच्याबद्दल लिहावे का?

मी लिहितेय आणि का कुणास ठाऊक, युद्धआघाडीवरच्या त्या अविश्वसनीय खूप पूर्वीच्या शरदाची मला आठवण होतेय आणि मी स्वतःला पाहते – बगलेत वैद्यकीय थैली असलेली आणि हातांमध्ये कलकलणारी कोंबडी धरलेली एक अवघडलेली मुलगी.

एकदा माझ्या मुलीने – आठवीत शिकणाऱ्या – "स्वतःला विकण्याचा प्रयत्न करणाऱ्या" कुत्र्याबद्दलची हकीकत सांगितली..

ह्या विचित्र प्राण्याला आल्योन्काने मॉस्कोतील पक्ष्यांच्या बाजारात पाहिले होते. दर रविवारी ती ह्या बाजारात धावायची. तेथे सर्व प्रकारचे प्राणी विकत: पक्षी, गिनी डुकरे, कुत्रे ...

एका उंच दगडी कुंपणापाशी कुत्रे त्यांच्या मालकांपाशी बसून होते. त्या वेगळ्या वातावरणामुळे आणि विश्वास-घाताच्या आगामी चाहुलीने बिथरलेले कुत्रे येणाऱ्या-जाणाऱ्या प्रत्येकावर भुंकत होते. प्रत्यक्षात त्यांचे मालक गुपचूप त्यांना डिवचत होते, घोडे विकताना जिप्सी म्हणे त्यांना डिवचतात तसे. कुत्रा जेवढा जास्त वाईट स्वभावाचा, तेवढी त्याची किंमत जास्त, कारण तो चांगली राखण करील.

फक्त एक अत्यंत हडकुळा, स्वच्छ न केलेला अल्सेशिअन कुत्रा कुंपणापाशी मालकाविना एकटाच मुकाट बसून होता. नव्या मालकाबरोबर जाणाऱ्या त्याच्या प्रत्येक शेजाऱ्याकडे तो असूयेने पहात होता. त्याचे केविलवाणे डोळे, अनि-श्चितपणे हलणारी त्याची शेपूट आणि त्याचा ताणलेला एकूण पवित्रा सांगत होता – नव्हे, ओरडत होता: "कृपया मलासुद्धा घ्या हो! तुमच्या पाया पडतो!"

पण किंमत नसलेल्या मालाबद्दल बाजारात कुणालाही आस्था नव्हती. स्वतःच स्वतःला विकणारा अथवा देऊ करणारा कुत्रा – हे काहीसे विचित्र होते व संशयास्पद होते. अल्सेशिअन जातीचा असला म्हणून काय झाले... असले अल्सेशिअन आम्हाला ठाऊक आहेत!

ओळीने तीन रविवार आल्योन्का बाजारात आली होती व दरवेळी हा कुत्रा त्याच जागी, दगडी कुंपणापाशी, बसलेला तिने पाहिला होता. फक्त त्याचे डोळे जास्त निराश बनले होते आणि त्वचेबाहेर त्याची हाडे अधिक उठून दिसत होती...

अर्थात ही हकीकत ऐकल्यानंतर आमच्या सर्व कुटुंबाने 

तात्काळ निर्णय घेतला होता की, त्या कुत्र्याच्या "जातीचा" विचार न करता – जरी तो खानदानी कुळातील असला तरी – त्याला दत्तक घ्यायचे!

म्हणून माणसांच्या आणि प्राण्यांच्या गर्दीतून वाट काढत आम्ही घाईघाईने चाललो होतो. गोंगाट, भुंकण्यांचे आवाज, कलकलाट. माझे डोळे भिरभिरत होते.

तेवढ्यात पट्ट्यांना ओढणाऱ्या व घोगऱ्या आवाजात भुंकणाऱ्या कुत्र्यांच्या गर्दीत एक मांजराच्या आकाराचा, वाळूच्या रंगाचा भेदरलेला प्राणी बर्फावर बसलेला मी पाहिला. त्याचे तेजस्वी पिवळे डोळे टप्पोरे होते, शरीर ताणलेले होते, झुपकेदार शेपूट होते, सडपातळ पाय होते, मागचे पाय "X" अक्षरासारखे होते.

प्राण्याच्या मानेभोवती घरगुती बनावटीचा पट्टा होता. पट्ट्याला जोडलेली साखळी घाबरट चेहऱ्याच्या एका मुलाने धरली होती: नकोशा झालेल्या ह्या प्राण्याची ब्याद टाळून ये, अशी त्या मुलाला बहुधा घरातून तंबी मिळालेली दिसत होती.

मी त्या प्राण्यापाशी उकीडवी बसले आणि त्याला गोंजारू लागले. त्याने कान खाली पाडले. "सांभाळा, चावेल!" मुलगा ओरडला. पण प्राणी एव्हाना माझ्या हातांमध्ये होता. त्याचे हृदय जोरात धडधडत होते, शरीराला आचके बसत होते. नवल नाही! जंगली प्राण्याला किती चिंता!

पण मला तो "पशू" वाटला नाही – तो खूप दुःखी होता. मला ते लहान पिलू वाटले. नंतर आम्हाला समजले की, ती तरुण पण पूर्ण वाढ झालेली, स्तेप प्रदेशातील "कोर्साक" जातीची कोल्ही होती.

ज्ञानकोशात ह्या कोर्साकांबद्दल अशी माहिती आढळते: "सर्वसामान्य कोल्ह्याप्रमाणे दिसतात, पण आकार लहान असतो (शरीराची लांबी ५०-६० सें. मी., शेपूट २५-३५ सें. मी.)... आशियातील वाळवंटी व निम-वाळवंटी प्रदेशात आणि आग्नेय युरोपात आढळतात. सोविएत संघात – उत्तर कॉकेशसपासून पूर्वेकडे बैकलपार, उत्तरेला ५०° उत्तर अक्षांशापर्यंत. कुरतडणाऱ्या प्राण्यांच्या नाशासाठी उपयुक्त."

पण ह्या "उपयुक्तते"च्या कृतज्ञेपायी मानवजात कोर्साकांचा निर्दयपणे संहार करीत आहे; ज्ञानकोशातील खुलाशानुसार त्यांची "केसाळ कातडी" खूप किंमत देतात.

...अशा रीतीने भेदरलेले कोर्साकचे पिलू माझ्या मालकीचे बनले व दहा रूबलची नोट घाबरलेल्या व्यापाऱ्याच्या हाती पडली (किंमत महाग नव्हती!).

मी टाकलेल्या पावलाच्या गंभीर परिणामांची मला पूर्ण जाणीव होती. जंगलातून सुसंस्कृत जगात प्राण्याला आणल्यानंतर आणि त्याला पिंजऱ्यात बंदिवान ठेवण्याची तुमची इच्छा नसल्यानंतर भुईफोड्यांप्रमाणे भराभर उद्भवणाऱ्या संघटनात्मक अडचणी केवळ मला अभिप्रेत नव्हत्या; अथवा "ज्याला स्वीकारलंस त्याची जबाबदारी नेहमी तुझ्यावर राहील" ह्या रात्रंदिवस मनाला छळणाऱ्या वैयक्तिक जबाबदारीबद्दलही मला म्हणायचे नव्हते...

सर्वांत वाईट म्हणजे "आपल्या प्राण्यांशी" असलेल्या नात्यांची अखेर नेहमी शोकांत असते. "दुसरे जग" त्याच्या नियमांचा भंग करणाऱ्यांवर सूड उगविते.

त्या प्राण्याचे नाव काय, त्याला त्याने कुठून आणले, ते कुठे रहात होते, काय खात होते ह्याबद्दल त्या मुलाला

माहिती विचारण्याची माझी इच्छा होती, कारण उंदरांचा आहार त्याला पुरविणे अर्थातच मला शक्य नव्हते. तेवढ्यात ज्या कुत्र्यासाठी आम्ही मुळात बाजारात आलो होतो, त्याला सोबत घेऊन आल्योन्का झंझावाताप्रमाणे माझ्यावर येऊन कोसळली. कुत्रा खरोखरीच अल्सेशिअन होता. अखेर त्याला "विकत घेतले" होते ह्याचा त्याला विलक्षण आनंद झाला होता आणि माझ्या मुलीपाठोपाठ जणू चिकटविल्याप्रमाणे चालत होता. तेथल्या तेथे कुत्र्याचे आम्ही नाव ठेवले – तीखोन, तीश्का. आणि कोल्हीला ॲलीस, आलीस्का.

दरम्यान ॲलीसचा पूर्वीचा मालक गायब झाला होता...

तेव्हा ती आमच्या मॉस्कोत कशी आली हे आम्हाला कधीच समजले नाही. जणू लहानपणी ऐकलेल्या, अर्धवट विसरलेल्या परीकथांमधील अज्ञात प्रदेशातून स्वतःच्या लांबोड्या पायांवर चालत ती आमच्यापाशी आली होती...

बाजारच्या गोंगाटातून वाट काढत थरथरणाऱ्या ॲलीसला उराशी धरून मी चालू लागले आणि एक वांड कारटी माझ्या पाठी धावत सतत मला विचारीत होती: "मावशी, मावशी, कशाला तुम्ही तिला विकत घेतलं? केसाळ कॉलरसाठी ना?"

कपाटाखाली कोंबडीचा पाय सरकविण्यात आला. आलीस्काला काय खायला घालावे हे अजून आम्हाला माहीत नव्हते, पण ती शाकाहारी नक्कीच नव्हती ह्याची आम्हाला जाणीव होती.

लौकरच हाडे फोडण्याचा आवाज आम्ही ऐकला.

माझ्या मुलीने कपाटाखाली डोकावून पाहिले – हाडांच्या कडकडीऐवजी खोकण्याचा आवाज सुरू झाला. आम्ही घाबरलो : आलीस्काच्या घशात एखादे हाडुक अडकले तर नाही? पण लौकरच उलगडा झाला की, मध्यम प्रतीचा राग कोर्साक कोल्ही खोकण्याद्वारा व्यक्त करतात.

केस पिंजारून आणि गोंधळलेल्या मनःस्थितीत, जंगली जनावराच्या वासाने अस्वस्थ बनलेली आमची मांजरी जेव्हा खोलीत आली, तेव्हा ॲलीसने तिचा राग आणखी एका रीतीने व्यक्त केला.

ॲलीस कपाटाखालून जोरात बाहेर धावत आली आणि कुत्र्याच्या पिलाप्रमाणे उंच स्वरात भुंकू लागली. ही रागाची परीसीमा होती असे आम्हाला समजले.

मांजरीने उंटाप्रमाणे शरीराची कमान करून प्रत्युत्तर दिले. फिस्कारणाऱ्या आणि चिडलेल्या मांजरीला मी पटकन उचलून खोलीबाहेर नेले.

औपचारिक ओळख करून देण्यासाठी आम्ही जेव्हा तीखोन कुत्र्याला आत आणले, तेव्हाही ॲलीसने भुंकून भुंकून घर डोक्यावर घेतले. बाजारातून घरी परतताना ती दोघे कमालीच्या भेदरलेल्या मनःस्थितीत होती, त्यामुळे त्यांनी एकमेकांकडे तेव्हा मुळीच लक्ष दिले नव्हते. पण आता खोलीत हालचालीचे संपूर्ण स्वातंत्र्य मिळाल्यानंतर व खोलीच्या भूगोलाचे ज्ञान झाल्यानंतर, हा आपला प्रदेश आहे अशी ॲलीसची धारणा बनली होती. हा छोटा प्राणी आपल्यावर एवढ्या रागारागाने का भुंकतोय म्हणून शांत-स्वभावी तीखोन आश्चर्याने ॲलीसकडे बघत राहिला. वस्तुतः पंजाच्या एका थपडीत त्याने तिला तीन ताड दूर

उडविले असते. तेव्हा हा ओळखसमारंभ अयशस्वी ठरला. कुत्र्याला बाहेर नेणे भाग पडले.

शत्रूंच्या कारवाया हाणून पाडल्यानंतर "विजेती" ॲलीस फर्निचर हुंगू लागली. प्रत्येक खुर्ची, टेबलाचा प्रत्येक पाय तिने हुंगला. मग खिडकीजवळच्या आरामखुर्चीवर तिने उडी मारली, खिडकीच्या चौकटीत बैठक घातली आणि बर्फाच्छादित मॉस्कोतील अंगण मोठ्या कुतूहलाने ती निरखू लागली. त्यानंतरच्या दिवसांमध्ये असंख्य वेळा ती असे वागली. खिडकीबाहेर स्वातंत्र्याचा आरंभ होता...

एका छोट्या, पण खोलगट चिनी मातीच्या रक्षापात्रात मी सूप ओतले व ॲलीससमोर ठेवले. तिने ते हुंगले आणि मग त्यावर बसून पात्रात थेट लघवीची धार सोडली. आम्हाला धक्का बसला. वागण्याची काय ही रीत!

नंतर मला समजले की, स्वतःच्या साठ्यांवर खूण करून ठेवण्याची कोल्ह्यांची ही रीत आहे. पण प्रथम ते खाद्यपदार्थांना जमिनीत पुरतात. इथे जमीन नव्हती तरी ॲलीसने आपले काम चोख बजावले. उपजत स्वभाव...

उलट मला असा संशय आहे की, इथे ॲलीसच्या विलक्षण विनोदबुद्धीमुळे असे घडले. जेव्हा जेव्हा तिला अन्न आवडत नसे, तेव्हा तेव्हा ती ही "लघ्वीपात्रा"ची युक्ती वापरायची.

रात्र जशी वाढत गेली, तशी आलीस्का अधिक हालचाली करू लागली. खारीप्रमाणे ती खोलीभर धावू लागली, खुर्चीवर उड्या मारू लागली, खुर्चीवरून खाली जमिनीवर उड्या टाकू लागली. कारण कोल्ही निशाचर प्राणी आहेत. पण आम्ही तर निशाचर नाही... तेव्हा झोपण्यापूर्वी आली-

स्काला न्हाणीघरात कोंडून ठेवण्याचा आम्ही निर्णय घेतला. पण आमचा निर्णय प्रत्यक्ष अंमलात आणणे तेवढे सोपे ठरले नाही.

सबंध दिवसभर भोजनदालनात जाता-येताना आम्ही घाबरून वेगाने दार बंद करून घेत होतो, कारण चपळ कोल्ही कॉरीडॉरमध्ये निसटेल व तेथून दुसऱ्या खोलीत धावेल अशी धास्ती वाटत होती. प्राणीसंग्रहालयाचा उग्र दर्प एका खोलीत दरवळत होता तेवढा पुरे होता!

पण आलीस्काला सबंध फ्लॅटमध्ये भटकायची इच्छा होती आणि अस्सल कोल्हीच्या धूर्तपणाने ती पुनःपुन्हा बाहेर निसटायचा चिकाटीने प्रयत्न करीत होती.

पण कॉरीडॉरकडे जाणारे दार उघडे असल्याचे जेव्हा तिने पाहिले, तेव्हा बाहेर जाण्यास तिने पूर्ण नकार दिला.

मी दोऱ्याला मांसाचा तुकडा बांधला आणि मांजरीच्या पिलाशी खेळावे तसे आलीस्काशी खेळत हळूहळू तिला कॉरीडॉरकडे भुलवीत नेण्याचा प्रयत्न करू लागले. ती कॉरी-डॉरमध्ये आली, पण कुणीतरी भोजनदालनाचे दार बंद करण्याचा प्रयत्न करताच विजेच्या वेगाने ती भोजनखोलीत परत धावायची आणि तिला पकडणे अशक्य ठरायचे. खूप खुषीत आलेली, तिरपे "फॅशनेबल" डोळे खोडकरपणे चमकत असलेली आणि कानांपर्यंत जबडा वासून हास्य करणारी आलीस्का आमची जणू टवाळी करीत होती.

रात्री दोन वाजेपर्यंत आलीस्काशी "खेळणे" आम्हाला भाग पडले. सामुदायिक अभियांत्रिकी प्रयत्नांती बनविलेला सापळा – दोरी – जिचे एक टोक आल्योन्काच्या हाती व दुसरे दाराच्या मुठीला बांधले होते – पटदिशी उपयोगी

पडला नाही. दार बंद होण्यापूर्वी भोजनखोलीत पळत येण्यात आलीस्का यशस्वी ठरत होती.

शेवटी सापळा उपयोगी पडला. बहुधा आलीस्का त्या खेळाला कंटाळली असावी. काहीही असो, तिला न्हाणीघरात बंद करण्यात आले.

आलीस्काच्या साहसामुळे उत्तेजित बनल्यामुळे खूप वेळ-पर्यंत मला झोप लागली नाही. अखेर झोपेच्या गोळ्या घ्याव्या लागल्या.

नुकती गुंगी लागत होती – धडाड आवाज घुमला.

ताडकन उठले. माझ्यासमोर अनपेक्षित दृश्य उभे होते. वॉश-बेसिनमध्ये मागील पायांवर उभे राहून आलीस्का पुढील पायांनी काचेच्या कपाटावरील वस्तू – टूथब्रशांचा ग्लास, टूथ पावडर, साबण, शाम्पू, ओ-द-कोलन, क्रीम – पद्धतशीरपणे खाली ढकलत होती. ह्या सर्व वस्तू वॉश-बेसिनमध्ये अथवा खाली फरशीवर पडून फुटत होत्या, सांडत होत्या, उधळत होत्या.

कोल्हीने सावकाशपणे मागे वळून माझ्याकडे पाहिले. तिचे मुस्कट टूथ पावडरने माखले होते. पुन्हा तिने ह्या कानापासून त्या कानापर्यंत जबडा पसरून हास्य केले.

तो सगळा पसारा मी आवरला, न्हाणीघरातून शक्य होत्या तेवढ्या सर्व वस्तू बाहेर आणून ठेवल्या, परत झोपे-च्या दोन गोळ्या खाल्ल्या आणि आता आलीस्का कोणताही आवाज करू शकणार नाही अशा खात्रीने झोपले.

हाय, माझा आनंद आणि माझी झोप अल्पायुषी ठरले. कोल्हीच्या अकलेबाबत मी अधोमूल्यन केले होते...

खरवडण्याच्या विचित्र आवाजामुळे मला जाग आली.

कोल्हीच्या नावाने शिव्याशाप मोजत मी उठले आणि लहान मुले बर्फाच्या टेकडीवरून जशी खाली घसरत जातात तशा रीतीने न्हाणीघरातील टबात आलीस्का घसरण्याचा खेळ करीत असलेली मला आढळली. पण हे "बाळ" घसरताना ब्रेक लावण्यासाठी नख्या वापरीत होते, त्यामुळे खरवडण्याचा आवाज होत होता आणि माझी त्याने झोप-मोड केली होती.

"टेकडीवरून घसरण्याचा" उद्योग सकाळपर्यंत – म्हणजे तिच्या "रात्री"पर्यंत – आलीस्का थांबवणार नाही हे स्पष्ट झाले होते...

ॲलीसला आमच्याकडे रहायला येऊन दोन दिवस झाल्यानंतर तिची प्रकृती बिघडल्याचे माझ्या ध्यानात आले. तिला तिच्या गादीचा तिटकारा होता (खूप गरम!) आणि थंड फरशीवर कुशीवर निजून ती मंद कण्हत होती. तिचा श्वासोच्छ्वास ताप चढल्याचे दर्शवीत होता आणि नाक कोरडे पडले होते व भाजत होते.

मी तिला जनावरांच्या डॉक्टरकडे घेऊन गेले. तात्काळ सर्वांचे तिच्याकडे लक्ष वेधले. सुरेख संगमरवरी रंगाच्या ग्रेट डेन कुत्र्यानेसुद्धा त्याचे चाहते गमावले.

पण ॲलीस तिच्या भव्य यशाबाबत उदास होती. तिची प्रकृती खरोखरीच फार बिघडलेली होती. आम्हाला रांगेत पुढचा मान मिळाला. वालेरीयनच्या बाटलीचे बूच घशात अडकवून घेणाऱ्या मद्यपी मांजराला घेऊन स्मित करणारी एक म्हातारी बाहेर येताच मी "बाळा"ला हातावर घेऊन डॉक्टरांच्या खोलीत शिरले.

चमचमणाऱ्या “वाळाच्या” शेपटीला प्रथम सरळ वर उचलून थर्मामीटर लावण्यात आले. ताप ४४.५ से. होता! माणसांपेक्षा शरीराचे तपमान जास्त असणाऱ्या जनावरांच्या दृष्टीनेसुद्धा हे तपमान फार वरचे होते.

मग डॉक्टरांनी लक्षपूर्वक रुग्णाला तपासले व रोगनिदान केले: मेम्ब्रेनस न्यूमोनिया.

बहुधा आलीस्काला पक्ष्यांच्या बाजारात थंडी बाधली असावी. कारण हालचाल न करता खूप वेळपर्यंत ती बर्फावर बसून राहिली होती आणि भेदरटपणापायी तोंड उघडे टाकून तिने भरपूर थंड हवा गिळली होती.

“परिस्थिती गंभीर आहे,” जनावरांचे डॉक्टर म्हणाले. “पेनिसिलीनचं इंजेक्शन दिलं पाहिजे. पण जंगली पशूला इंजेक्शनमुळं धक्का बसण्याची शक्यता आहे. म्हणून आजाऱ्याला गोळ्या देऊन उपचार करण्याचा प्रयत्न करू. काय हिचं नाव?”

“आलीस्का.”

“ठीक, आलीस्का. आडनाव काय?”

“आडनाव?” न समजून मी परत प्रश्न केला.

“तुमचं आडनाव काय?” संयम सुटून डॉक्टरनी विचारले.

मी आडनाव सांगितले आणि डॉक्टरांनी औषधाचा कागद लिहून दिला. घरी परतताना वाटेत मी केमिस्टच्या दुकानात शिरले आणि औषधाच्या कागदाला उलगडून पाहिले तेव्हा “आजाऱ्याचे आडनाव, नाव, वडिलांचे नाव” ह्या स्तंभात चक्क लिहिलेले होते: “कोल्ही ॲलीस द्रूनिना!”

औषधाच्या कडू गोळ्या ॲलीस द्रूनिनाला कशा गिळायला भाग पाडायच्या ही पुढची समस्या होती. दिवसातून तीन वेळा कोल्हीला फसवायचे काम महाकठीण होते!

कच्च्या लिव्हरचा एक तुकडा मी कापला आणि त्यात औषधाची गोळी दाबून बसविली. माझ्या युक्तीला प्रथम यश आले – आजाऱ्याने लिव्हर व गोळी दोन्ही गिळली. अर्थात त्यानंतर तिचा चेहरा गोंधळलेला व नाराज बनला: "माझ्या खाण्यात कसली घाण मिसळली होतीस?"

दुसऱ्या वेळी आलीस्काने लिव्हर खाल्ली, पण गोळी बाजूला टाकली.

तिसऱ्या वेळी तिने खाणेच नाकारले.

पुन्हा एकदा कोल्ही शहाण्या बाळासारखी कुशीवर झोपली, पूर्वी गोंडेदार असलेली शेपूट तिने मागील पायांखाली दुमडली व मंदपणे ती कण्हू लागली.

गोळी तिला गिळायला लावणे अशक्य होते हे स्पष्ट झाले आणि औषधोपचाराविना ती मेली असती. पुन्हा मी जनावरांच्या दवाखान्याकडे धाव घेतली.

"मग काय करणार," डॉक्टर म्हणाले, "धोका पत्करू, इंजेक्शन देऊ!"

नर्सने आलीस्काचे मागचे पाय ताणून धरले, डॉक्टरांनी जाड सुईची सीरींज उचलली... माझा श्वास भीतीपायी रोधला गेला. पण सुदैवाने सर्व काही ठीक पार पडले.

तेव्हापासून मामला सुधारला, कोल्हीची प्रकृती सुधारू लागली. अर्थात दिवसातून तीन वेळा इंजेक्शनसाठी तिला घेऊन जाणे अशक्य होते. तेव्हा माझ्या नवऱ्याने शूर

निर्णय घेतला. त्याने आयुष्यात कधीही हातात इंजेक्शनची सुई धरली नव्हती, पण आलीस्काला टोचण्याचे त्याने कबूल केले.

तर घाबरलेल्या आणि संशयी आलीस्काला मी माझ्या मांडीवर घेऊन बसले. अलेक्सेयने सीरींज भरली, आलीस्काचा "X" आकाराचा उजवा मागील पाय हळूच ओढला, त्यावर आयोडिन फासले आणि ठामपणे सुई घुसवली. ॲलीस थरारली आणि पाठीमागून तिला विश्वासघाताने कोण "चावले" म्हणून वळून बघू लागली. पण दांडचाला पुरेसा दाब मिळाला नव्हता – सुईला अडथळा आला असावा. शिकाऊ डॉक्टरने कपाळाला आठ्या घालून सुई बाहेर काढली. पुन्हा त्याने पाय नीट धरला. त्या क्षणी मला आढळले की, माझा उजवा हात ॲलीसच्या तोंडात होता! अलेक्सेयने दुसऱ्यांदा सुई घुसवली. मी डोळे मिटले–ॲलीसने कुरतडलेली लोखंडी साखळी मला त्यावेळी आठवली. तिला छळणाऱ्यांचा तिने चावा का घेऊ नये? तिच्या भल्यासाठी आम्ही तिला दुखवत होतो हे तिला कसे समजणार?

पण काही उपजत भावनेने तिला हे समजले होते. अथवा माझ्यावर तिचा अपार विश्वास होता. अलेक्सेयने जेव्हा तिला सुई खुपसली, तेव्हा तिने हलकेच दात आवळून घेतले.

आता ती भराभरा सुधारू लागली. ती बरी होत असल्याची अनेक लक्षणे दिसत होती, पण सर्वांत खात्रीचे लक्षण म्हणजे तिचे सैतानी चाळे परत सुरू झाले होते. पहिल्याच खोडकर चाळ्याने आमची खात्री पटली.

पक्ष्यांच्या बाजारात भीतीने आणि थंडीने थरथरणाऱ्या

छोटया पशूमधून आमच्या घरातील सर्व माणसांच्या कौतुकाचे केंद्र बनायला आलीस्काला फार थोडा अवधी लागला.

तिची मर्जी संपादन करण्यासाठी आम्ही एकमेकांशी स्पर्धा करू लागलो आणि मी तिची सर्वांत आवडती होते ह्याचा मला फार गर्व वाटू लागला.

फक्त मलाच ती उचलू द्यायची, तरीही पहिले काही सेकंद ती थरथरायची व कान खाली पाडायची. जणू जंगली पशूची तिची उपजत संवेदना मानवी प्राण्याशी जडलेल्या तिच्या भावनेशी संघर्ष करायची.

आलीस्काला हाताने खाऊ घालण्याची हिंमत फक्त मीच करायची. ती नेहमी अलगदपणे माझ्या हातून खाऊ घ्यायची आणि माझ्या बोटांना ती चावेल अशी मला कधीही भीती वाटली नाही.

एकदा अलेक्सेयने आलीस्काला हाताने खाऊ घालण्याचे ठरविले आणि त्याने लिव्हरचा तुकडा तिच्यापुढे धरला. तिने तो तुकडा शांतपणे घेतला, फरशीवर खाली ठेवला आणि विजेच्या वेगाने त्याच्यावर ती झेपावली; जणू प्रतीकात्मक रीतीने तिने सुचविले: “तुझ्या बोटांना सांभाळ, अशी लाच देण्याची पुन्हा हिंमत करू नको!” नंतर ती ऐटीत व सावकाशपणे लिव्हर खाऊ लागली.

माझ्या मुलीला आलीस्काने दहशत घातली होती. आल्योन्काच्या पायांचा चावा घ्यायला ती धावायची. लांब दांड्याची केरसुणी हातात संरक्षणासाठी घेऊन आल्योन्का घरभर विचित्रपणे लांब उड्या मारीत धावायची व मदतीसाठी मला हाका मारायची.

आलीस्का नाराज व्हावी असे आल्योन्काने काय केले होते? कुणाला माहीत? कदाचित पूर्वी एखादी मुलगी आलीस्काशी क्रूर वागली असावी व आल्योना त्या मुली-सारखी दिसत असावी – उंच आणि झिपरी.

अथवा आल्योनाचा मोठा आवाज आणि हिसकणाऱ्या हालचाली आलीस्काला आवडत नसाव्यात. कुणाला ठाऊक!

अत्यंत काळजीपूर्वक हालचाली करायला व बोलायला मी शिकले. माझे स्नेही माझी थट्टा करीत की, ॲलीस आमच्याकडे रहायला आल्यापासून मी चालत नव्हते, तर तरंगू लागले होते; हातवारे न करता हातांनी हलक्याच खुणा करू लागले होते; बोलत नव्हते तर कुजबुजत होते...

पाळीव प्राण्याऐवजी जंगली पशू घरात बाळगण्याचा निर्णय मी का केला, असा काहींनी मला प्रश्न केला. कारण ह्यापायी मला अनंत अडचणी सोसाव्या लागत होत्या.

उत्तरादाखल मी नुसते खांदे उडविले. का? कारण त्यामुळे माझ्या आयुष्यात आनंद निर्माण झाला होता. आज्ञा न पाळणाऱ्या, अविश्वासू प्राण्याला मी प्रेमाने जसे जिंकत चालले होते, तसे आमच्यामधील सामंजस्याचे व विश्वासाचे अधिकाधिक धागे बघण्यात मला आनंद मिळत होता.

जेव्हा मी घरी यायची, तेव्हा लिफ्टच्या दाराचा खाडदिशी झालेला नुसता आवाज ऐकताच ॲलीस कान टवकारायची, तोंडातून रातकिड्यासारखा बारीक आवाज काढायची आणि कुत्र्याप्रमाणे दाराशी धावायचा, हे समज-ल्यानंतर मी खूप खूष झाले होते. मात्र मी घरात आल्यानं-तर ती असा बहाणा करायची की, माझ्यासाठी खास

नव्हे, तर स्वतःच्या काही कामासाठी ती दारापाशी धावली होती! फार मानी!

मला तिचा हा मानी, संयमी, स्वतंत्र स्वभाव फार आवडत होता. त्यामुळे जवळिकीचे प्रत्येक चिन्ह अधिक मौल्यवान बनायचे.

संध्याकाळच्या वेळांना थकलेल्या आणि स्वतःवर चि-डलेल्या मनःस्थितीत, मानवी काळज्यांच्या अखंड प्रवाहाने हैराण झालेल्या अवस्थेत मी सोफ्यावर पाठीला पोक काढून बसलेली असताना जेव्हा हा जंगली प्राणी अचानक उडी मारून माझ्या मांडीवर बसायचा, तेव्हा मनात आनंदाचा जोरदार उमाळा उमटायचा.

आणि खोड्या? मुले खोड्या करतात आणि काही-वेळा अक्षरशः डोके फिरवून टाकतात, म्हणून माता त्यांच्या मुलांवर कमी प्रेम करतात का?

ॲलीसच्या वागण्यात एकूण माकडचेष्टा जास्त होत्या. वस्तू फाडून, तोडून, चावून दंगा करण्याची ऊर्मी दाबून ठेवणे तिला अशक्य होई. म्हणून आमच्या अनुपस्थितीत आणि रात्री तिला तिच्या "वैयक्तिक अपार्टमेंट"मध्ये — न्हाणीघर व कॉरीडॉरमध्ये — बंद करून ठेवण्यात येई. पण ही व्यवस्था तिने कधीही मान्य केली नाही व पुनः-पुन्हा खोल्यांच्या दारांखाली तिने खरवडून आणि चावून भोके पाडली. एके सकाळी कॉरीडॉरमधील लाकडी जमीन अर्धी उखडलेली बघून आम्ही हबकलोच. फळी न फळी उचकटली होती...

जेव्हा आम्ही घरात असू, तेव्हा आलीस्काला आत बोलावत असू अथवा बोलावणे नसले तरी ती आत घुसून यायची.

अडचण अशी होती की, खोलीतील अत्यंत अवघड कोपऱ्याची जागा ती हमखास शोधून काढायची व तेथील सर्व वस्तूंसह स्वतःचे "घर" बनवायची...

कधी कधी आलीस्का मला ऐकीवात नसलेले स्वातंत्र्य द्यायची – तिच्या झुपकेदार शेपटीला धरून कपाटाखालून तिला बाहेर खेचायची! ती धमकावणीवजा खोकायची, फिस्कारायची, दात चावायची, पण प्रत्यक्षात कधीही मला चावली नाही.

पण सोफ्याच्या आत घुसून स्प्रिंगांमध्ये तिने आपले बीळ बनविले तर आम्ही काय करणार? प्रथम प्रथम अशा प्रसंगी भयंकर "व्हॅक्युम क्लीनर काका" आम्हाला उपयोगी पडायचा, आमच्या रक्षणकर्त्याला आम्ही ते आदराने ठेवलेले नाव होते. त्याच्या घरघर आवाजाची सुरुवात होताच डोळे विस्फारल्या अवस्थेत आलीस्का पटकन सोफ्यामधून उडी मारून बाहेर यायची व न्हाणीघरात पळ काढून स्वतःच्या गादीवर तेथे गुपचूप निजून रहायची. पण काही काळानंतर तिला व्हॅक्युम क्लीनरची सवय झाली, त्याच्याबद्दल तिला भीती वाटेनाशी झाली, एवढेच नव्हे तर संतापाने त्याच्यावर ती जोरजोरात खोकू लागली. एकदा तर तिने त्याला चावण्याचा प्रयत्न केला.

तिचा आणखी एक छान छंद होता – टेलीफोनची तार कुरतडण्याचा.

आम्हाला सर्वांत हैराण करीत होता सबंध फ्लॅटमध्ये आणि जिन्यापर्यंत पसरणारा प्राणिसंग्रहालयाचा उग्र दर्प.

जेव्हा मी बसमध्ये अथवा भुयारी मेत्रोत प्रवेश करायची, तेव्हा आसपासचे लोक नाकांनी हवा हुंगू लागत – आमच्या

सर्व कपड्यांना आलीस्काचा दर्प यायचा. एका खवट म्हातारीचे मेत्रोत एक भाष्य माझ्या कानांवर आले: "डोळे रंगवलेल्या ह्या सुरेख बाईला बोकडासारखी घाण मारतेय!"

ह्या घाण वासापासून मुक्तता घडणे अशक्य ठरले – सर्व दुर्गंधिनाशक द्रव्ये त्यापुढे निःष्प्रभ ठरली होती.

त्या काळात बहुतेक सारा वेळ हातात फडके घेऊन गुडघ्यांवर रांगण्यात मी खर्च करायची. स्थानिक केमिस्टाकडून प्रचंड प्रमाणात खरेदी केलेला चुळा मारण्याच्या द्रवपदार्थाला नुकत्याच घासून काढलेल्या फरशीवर मी भरपूर ओतायची.

माझ्या एका स्नेह्याने भारताहून माझ्यासाठी बहुमोल भेट आणली – चंदनी उदबत्त्या. आम्ही त्यांना "कोल्हाप्रतिबंधक" म्हणत असू. जेव्हा कुणी पाहुणे आमच्या घरी अपेक्षित असत, तेव्हा आम्ही एक-दोन उदबत्त्या आधीच पेटवून ठेवत असू. त्या जळू लागल्या म्हणजे घरभर प्रसन्न, डोके जड करणारा वास दरवळू लागायचा; गूढ भारतीय देवळांचा वास दरवळू लागायचा... आणि ॲलीसचा वासही त्यात यायचा. कोणतेही "कोल्हाप्रतिबंधक" शंभर टक्के गुणकारी नव्हते!

सुदैवाने उन्हाळ्याचा मोसम आला आणि "आलीस्काच्या गंधा"ची समस्या लांबणीवर पडली. मॉस्कोनजीकच्या उपनगरात आम्ही एक दाचा* भाड्याने घेतला, तेथे एक उघडा पिंजरा बनविला आणि त्यात कुत्र्याचे घर ठेवले – आलीस्कासाठी शानदार घर.

---

* दाचा – रशियन धर्तीचे उन्हाळी निवासस्थान.

नव्या घरातील मुक्कामाच्या दुसऱ्या दिवशी पिंजऱ्यातील दृश्य पाहून मी कमालीची चकित झाले... तीखोन आलीस्काशी मजेने खेळत होता! कुत्र्यांच्या पिलांप्रमाणे ती वागडत होती. हा घ्या कुत्र्यांना कोल्ह्यांबद्दल वाटणाऱ्या "जन्मजात तिटकाऱ्या"चा पुरावा!

माझ्या आयुष्यात तीखोनसारखा प्रेमळ आणि लळा लावणारा दुसरा कुत्रा मी पाहिलेला नाही. तो सर्वांशी मैत्री जोडू पहायचा. ज्या बाईकडून आम्ही दाचा भाड्याने घेतला होता त्या मान्या आजीच्या घराच्या आवारात रात्रीच्या वेळी रानातून येणाऱ्या साळिंदरांशीसुद्धा मैत्री जोडण्याचा त्याने प्रयत्न केला होता. पण ह्या प्रयत्नांची अखेर तीखोनच्या बाबतीत नेहमी एकसारखी व्हायची: रक्ताळलेले नाक आणि चुरडलेल्या आशा. पण पुढचा फिस्कारणारा काटेरी चेंडू त्याला समजून घेईल ही आशा तीखोन कायम उराशी बाळगून होता...

पण तीखोन पिंजऱ्यात गेला कसा? कुंपणावरून उडी मारून? पण कुंपणाची उंची जवळ जवळ दोन मीटर! ठीक आहे, तो बाहेर परत कसा येईल ते पाहीन.

अगदी साध्या रीतीने—मांजरीसारखा. पिंजऱ्याच्या जाळीला नख्यांमध्ये पकडून. अर्थात हे दृश्य बघणीय मुळीच नव्हते, पण निदान "कुंपणावरचा कुत्रा" ह्या म्हणीचा अर्थ खुद्द डोळयांमार्फत मला समजला.

आता तीखोन दिवसा अगर रात्री कोणत्याही वेळी त्याच्या मैत्रिणीला भेटायला जाऊ शकत होता. ह्या भेटींचा प्रकार ठरीव होता. तीखोनला पाहताच आलीस्का पिंजऱ्यात अस्वस्थपणे चकरा मारू लागायची. तीखोन आलीस्काच्या

भूमीवर धप्पदिशी पडेपर्यंत ती पिंजऱ्यावर धडका मारीत रहायची आणि आलीस्काची शेपूट पकडण्याच्या इराद्याने तीखोन तिचा पाठलाग सुरू करायचा. दोघे धावपळीत कमालीची उत्तेजित बनत. काहीवेळा आलीस्का पटकन मार्ग बदलायची आणि स्वत:ला वेळीच आवरू न शकलेला तीखोन भरवेगात कुंपणाच्या तारांवर जाऊन आदळायचा.

त्यांच्या धावपळीच्या आवाजापायी काहीवेळा मांजरी तेथे अवतरायची. पिंजऱ्याच्या चार खांबांपैकी एका खां-बावर ती बैठक मारायची आणि "लढवय्यां" वर टप्पोरे पिवळे डोळे रोखून मनोऱ्यावरील पहारेकऱ्याप्रमाणे बसून रहायची. अर्थात ती आलीस्काच्या पक्षाची असे आणि रक्तपिपासू कुत्र्याच्या जबड्यात कोल्हीची अखेर होणार ह्या कल्पनेने ती कमालीची अस्वस्थ बनायची. अशा क्षणी ती स्वत:च्या शरीराची जास्तीत जास्त मोठी कमान टाकाय-ची, तिच्या अंगावरील केस ताठ उभे रहायचे आणि तीखोन-वर झेप घालण्याच्या पूर्वतयारीत उच्च स्वरात ओरडायची. अनेकदा अशा अखेरच्या क्षणी तिला खेचून घेण्यात मला जेमतेम यश आले होते...

आलीस्काला व तीखोनला एकाच भांड्यामधून मी खाऊ घालायची. पिंजऱ्याची मालकीण नेहमी प्रथम खायची. तीखोन जिभल्या चाटीत सभ्यपणे शेजारी उभा रहायचा व मैत्रिणीचे खाणे संपण्याची वाट पहायचा. पण त्याची मैत्रीण हावरी होती. सर्व खाणे कधी शक्य होणार नाही ह्या विचाराने तिचे डोके फिरायचे. न चावताच मांसाचे मोठमोठे तुकडे ती भराभरा गिळायची व अखेर पोटात जागा उरली नाही अशी खात्री पटल्यानंतर भांड्यातून

मांसाचा मोठा तुकडा उचलून दातात पकडायची व इकडे-तिकडे धावू लागायची. जणू तिला म्हणायचे असे: मैत्रीचे ठीक आहे, पण आधी स्वतःची काळजी घेतली पाहिजे!

शेवटी स्वतःचा खजिना ती पुरून ठेवायची, मग घाबरून परत खणायची व मांसाचा तुकडा दातात धरून पिंजऱ्यात चकरा मारू लागायची.

तीखोन शांतपणे तिचे चाळे पहायचा आणि नंतर तेवढ्याच शांतपणे तिचा खजिना उकरून गट्ट करायचा.

कोल्ही व कुत्रा यांची जोडी अविभाज्य बनली होती आणि तिला असा विश्वासू मित्र मिळाल्याबद्दल आम्ही खूष होतो. पण एकदा कुत्र्याच्या पिलाप्रमाणे केविलवाणे केकाटणे मी ऐकले. कोण तक्रार करीत होते, कुणाचा अपमान झाला होता?

मला आढळले की, खेळ ऐन रंगात आला असताना तीखोन निघून गेला होता, म्हणून आलीस्का तक्रार करीत होती. तिच्या खेळगड्यापाठोपाठ ती पिंजऱ्याची जाळी खरवडत होती. ती अर्ध्या मीटरपेक्षा जास्त उंच चढू शकत नव्हती आणि पिंजरा दोन मीटर उंच होता. वर चढण्याच्या प्रयत्नात आलीस्का पुनःपुन्हा खाली कोसळत होती...

हे केविलवाणे रडणे मला परत परत ऐकू येऊ लागले. आलीस्काच्या पिंजऱ्यात उडी मारून जाण्याची कला अवगत झाल्यानंतर आता आमच्या बागेभोवतालचे कुंपण ओलांडण्याचे नवे कसब तीखोनने आत्मसात केले होते. खेड्यात चार पायांच्या चंचल महिला भटकत असताना तीखोनला

घरात डांबून ठेवणे केवळ अशक्य होते. कुत्र्यांच्या प्रत्येक झुंजीबरोबर भुंकण्याचा कल्लोळ उसळायचा.

काहीवेळा तीखोन ओळीने तीन दिवस गायब व्हायचा आणि हडकुळया, केविलवाण्या व अंगभर चाव्यांच्या जखमा भरलेल्या अवस्थेत परत यायचा. आणि नेहमी पट्ट्या-शिवाय ...

परतताना कुंपणापासून कुत्र्याच्या खोपटापर्यंत तीखोन सर्वसाधारणपणे पोटावर सरपटत यायचा. स्वतःच्या शारीरिक व मानसिक जखमा चाटत अनेक दिवसपर्यंत तो घरात बसून रहायचा. मग पुन्हा पसार व्हायचा.

आलीस्का कोमेजली, खिन्न बनली, तिचा पूर्वीचा उल्हसितपणा नाहीसा झाला.

एक दिवस बाहेरून कुठूनतरी परतलेला तीखोन आलीस्काच्या घरात अवतरला. ती खूप खूष होईल अशी आमची अपेक्षा होती, पण तिने त्याच्याकडे दुर्लक्ष केले. तिच्या मजेशीर पाठलागाला सुरू करण्याचे त्याचे सर्व प्रयत्न विफल ठरले. आलीस्काने त्याच्याकडे परकेपणाने टक लावली, मोठ्ठी जांभई दिली व मागे वळून ती घरात गेली.

भली सकाळ. माझ्या हातात खाद्याचे भांडे.

मला पाहताच आलीस्का पिंजऱ्यात जोरजोरात चकरा मारू लागली – तिला जोरदार भूक लागलीय आणि न्याहरीला ती उतावीळ बनलीय. पिंजऱ्यात मी प्रवेश केला तेव्हा कुत्र्याप्रमाणे ती आनंदाने माझ्याभोवती उड्या मारू लागली आणि माझ्या फ्रॉकची किनार अधीरपणे खेचू लागली.

मग मी पिंजरा स्वच्छ करू लागले आणि दाताळयाला

चावे मारीत, उंदरांची शिकार करताना कोल्ही उड्या मारतात तशा माझ्या पायांशी उड्या मारीत अडथळा आणण्याचा खेळ आलीस्का मजेने खेळू लागली.

जर हवा चांगली असेल तर एक हलके घडीचे टेबल व घडीची खुर्ची मी पिंजऱ्यात आणते आणि काम करीत बसते. टेबलाच्या व खुर्चीच्या पायांवर आलीस्काच्या दातांचे वण उमटलेले आहेत.

आलीस्काशी संपर्क साधायला, तिच्या जास्त जवळ जायला, प्रत्येक तासाचा, प्रत्येक मिनिटाचा वापर करण्यास मी अधीर आहे.

पिंजऱ्यात काम करायला मला आवडते. आश्चर्य म्हणजे त्याच्या जाळीच्या भिंती दैनंदिन धांदलीपासून व चिंतांपासून माझे रक्षण करतात असे मला भासते.

कोल्ही तिच्याकडे लक्ष देण्याची मागणी करते, कधी टेबलाच्या पायांवर तर कधी माझ्यावर जोरदार धडका मारतेय, पण ह्यामुळे माझ्या कामात मला मुळीच अडथळा होत नाही. माझी अंतर्गत केंद्रितता सुरक्षित राखून विमनस्कपणे मी तिच्याशी खेळतेय. सर्व वाईट गोष्टींपासून मी ज्याचे रक्षण करू शकेन असा एक प्राणी जगात असल्याच्या भावनेने मी सतत आनंदात आहे.

(तेव्हा माझी तशी समजूत होती. जणू आपण ज्याला दैव म्हणतो त्या कायदा आणि योगायोग ह्यांच्या अनाकलनीय संयोगापासून कुणाचेही रक्षण करणे शक्य आहे!)

कधी कधी मी आलीस्काला जंगलात फिरायला घेऊन जायची. पट्टा बांधून चालायला ती कधीच शिकली नव्हती, म्हणून लहान बाळाप्रमाणे मी तिला कडेवर उचलून न्या-

यची. आलीस्काला ते भटकणे खूप आवडायचे. एखाद्या माकडासारखी ती चौकस होती आणि जंगलात आकर्षक गोष्टी खच्चून भरलेल्या होत्या.

एकदा असा एक प्रसंग घडला, ज्यामुळे आलीस्का-बद्दल माझ्या मनात अतीव आदर निर्माण झाला.

आम्ही नेहमीप्रमाणे फिरायला गेलो होतो. बायकांच्या उन्हाळयातील* पवित्र आणि किंचित खिन्न दुपार होती. उन्हाळी सुटीवाले एव्हाना निघून गेले होते आणि त्यांच्या भसाडचा ट्रान्झिस्टरांच्या आवाजापासून जंगल विश्रांती घेत होते. बाणासारख्या थेट रस्त्यावरून आम्ही चालत होतो. भोजाचे बुंधे चमकत होते, ऊन चकचकीत पडले होते, शांतता कानठळया बसवीत होती. अचानक एका महिलेची किंचाळी मी ऐकली. मागे वळून पाहिले तेव्हा वासरा-एवढ्या आकाराचा धिप्पाड पांढराशुभ्र केसाळ कुत्रा आमच्या पाठोपाठ रस्त्यावरून मुकाट धावत येत होता. मेंढ्या राखणाऱ्या दक्षिण रशियन जातीच्या त्या कुत्र्याला – पायरे-टला – मी ओळखले.

पायरेट ज्या भरघोस सफरचंदांच्या बागेची राखण करायचा, तिच्यापासून स्थानिक मुले तर चार हात लांबच रहात, पण दुसऱ्यांच्या सफरचंदांवर डल्ला मारण्याचा इरादा बाळगणारे प्रौढ लोकही त्या कुंपणाजवळून भीत भीत चालत, कारण पिंवळे सुळे विचकत हा पांढरा केसाळ पशू कुंपणामागून झेपा मारायचा.

आणि हा राक्षस आता थेट आमच्यावर चालून येत

---

* रशियातील उन्हाळा व शरदाचा मोसम ह्यांच्या सीमारेषेवरील काळ – अनु.

होता. उंच टाचांचे बूट घातलेली एक लठ्ठ बाई त्याच्या पाठोपाठ धावत होती. पण ती त्याच्यापासून खूप मागे होती, ओरडत होती, पट्टा हवेत फिरवीत होती. कुत्रा तिच्याकडे दुर्लक्ष करीत होता, दुष्ट मौन सतत पाळत होता.

आमच्यामधील अंतर वेगाने कमी होत चालले होते. धावण्यात अर्थ नव्हता – तसे करणे जास्त धोक्याचे होते. जागच्या जागी थांबले तर पायरेटबरोबर बोलून त्याची मालकीण पट्टा घेऊन येईपर्यंत त्याला थोपवून धरणे कदाचित शक्य झाले असते. तुम्ही भ्यालात हे त्याला न दाखविणे सर्वांत महत्त्वाचे होते.

दरम्यान आलीस्काला पसार होण्यास अद्याप सवड होती. पायरेटला ती अर्पण करण्यास अर्थातच मी तयार नव्हते. मी तिला तात्काळ मोकळे सोडणे आवश्यक होते – जरी ती मला परत कधीही भेटली नसती तरी...

आलीस्काला मी खाली जमिनीवर सोडले. ती झुडुपांमध्ये अदृश्य झाली. आता शिटचा मारीत शोधा!

कुत्र्याने एक तर आलीस्काचे पलायन पाहिले नव्हते, अथवा भक्ष्य म्हणून त्याने माझीच निवड केली होती. न भुंकता मुकाटपणे तो माझ्या दिशेने धावत येत होता. त्याच्या ह्या हल्ल्यातील त्याचे मौन सर्वांत भयानक होते.

भोजाच्या जाड बुंध्याला मी पाठ चिकटवून उभी राहिले. कुत्र्यात आणि माझ्यात आता केवळ दोन मीटर अंतर होते. "पायरेट, लाडक्या..." किळसवाण्या मधुर, घोगऱ्या आवाजात मी त्याच्याशी लाडीगोडी लावीत म्हटले, "मला चावू नको रे..."

कुत्रा थबकला. त्याच्या गोंधळलेपणाचा फायदा घेत मी अधिक स्थिर आवाजात म्हणाले: "तू किती सुंदर आहेस, किती शहाणा आहेस, किती प्रेमळ ..."

त्या क्षणाला झेप मारण्यासाठी पायरेटचे शरीर ताणले गेलेले मी पाहिले. त्याने माझ्या नरडीचा नेम घेतला होता. पहिली झेप पुरेशी उंच नव्हती. त्याच्या दुसऱ्या झेपेला मी कसे चुकवले कोण जाणे!

तिसऱ्या झेपेची मी घाबरून वाट पहात होते, पायरेट-च्या मालकिणीची प्रगती तिरप्या नजरेने पहात होते. भीतीपायी ती अधिक जोराने धावत होती, पण योग्य वेळी पोहोचणे बहुधा तिला अशक्य होते. शिवाय ही लठ्ठ बाई तिच्या तुफान कुत्र्याला आवरू शकली असती काय?

तिसऱ्या झेपेसाठी तयारीत खाली बसलेला पायरेट अचानक जोरात केकाटला. माझ्या डोळ्यांवर माझा विश्वास बसेना – माझ्या छोट्या कोल्हीने त्याच्या मागील पायात बुल्डॉगप्रमाणे चावा मारला होता...

पायरेट विजेच्या वेगाने वळला, पण त्याचे सुळे हवेत एकमेकांवर आपटले. गोंडेदार शेपूट उंच धरून आलीस्का एव्हाना धूम पळत होती. शेपूट वर धरल्यामुळे तिची लांबी निम्म्याने कमी झाली होती व त्यामुळे तिला पकडणे दुप्पट अवघड बनले होते. पायरेट मला पूर्ण विसरला आणि आलीस्काचा पाठलाग करू लागला.

मी सुटकेचा सुस्कारा टाकला व घरची वाट धरली. त्या मोठ्या कुत्र्याच्या तावडीत आलीस्का मुळीच सापडणार नाही अशी माझी खात्री होती. पण ती घरी परतेल का?

जेव्हा मी पिंजऱ्यापाशी धावले, तेव्हा ॲलीस तिच्या घराच्या छपरावर शांतपणे निजली होती. ती धावत आली होती हे फक्त तिच्या धपापत्या कुशींवरून समजत होते. अन्यथा तिचे एकूण दर्शन – सुस्तपणे, डोळे अर्धवट मिटून शरीर पसरणे – जणू सांगत होते: "असं काय विशेष घडलं? कोणत्याही आत्म-प्रतिष्ठा असणाऱ्या कोल्हीप्रमाणं मी वागले. आमच्या आशियातल्या वाळवंटी आणि निम-वाळवंटी प्रदेशात व आग्नेय युरोपात संकटात सापडलेल्या मित्राला एकटं टाकून जाण्याची रीत नाही!"

ऑक्टोबरचा पाऊस कोसळत होता व आलीस्काचे काय करावे हे न उमजून आम्ही दाचात बसलो होतो. शहरातील फ्लॅटमध्ये तिला ठेवणे शक्य नव्हते हे मात्र स्पष्ट झाले होते. शेवटी जीवनानेच ही समस्या सोडविली.

ऑक्टोबरच्या अखेरी कामानिमित्त मला बाहेरगावी जावे लागले आणि काहीशा अनिच्छेने आमचे प्राणी आमच्या मालकिणीच्या – मान्या आजीच्या हवाली मी केले. म्हाता-रीला आलीस्का आवडत नव्हती. "निरुपयोगी" जनावरे कशाला पाळायची असे तिचे मत होते.

तीन आठवड्यांनंतर मी परतले, तेव्हा ॲलीसचे घर मला रिकामे आढळले. मान्या आजीपाशी मी धावले. तिने आनंदी भाषणाने माझे स्वागत केले: "तुझी आल्का पळाली. तुम्ही गेल्यानंतर दोन दिवसांनी. सकाळी खाण्याचं भांडं घेऊन आले, तुम्ही सांगितल्याप्रमाणं. वाटलं, उडी मारून बाहेर येईल आणि माझ्यावर खोकू लागेल. ही उपकार मानायची रीत तिची! बघते, बाहेर येत नाही आणि पिंजऱ्याचं दार थोडंसं उघडं राहिलेलं. आदल्या रात्री

बहुधा ते बंद करायला मी विसरले असावे आणि ती कोल्ही मोठी लबाड जनावर ... तुम्ही रडताय का ? उलट आनंद मानला पाहिजे – पीडेतून मोकळ्या झालात म्हणून ! तिच्या-पायी किती कटकटी सोसल्यात ! ''

आलीस्का नाहीशी होऊन वीस दिवसांपेक्षा जास्त काळ लोटला होता. माझी खात्री होती की, जर ती ताबड-तोब ठार झाली नसेल, तर नक्की काही वेळा घरी परतली असणार. पण घरात मान्या आजीविना दुसरे कुणीही नव्हते ...

पण बहुधा आलीस्काचा स्वातंत्र्याचा पहिलाच दिवस तिच्या आयुष्याचा अखेरचा दिवस ठरला असणे जास्त संभवनीय होते. कुत्र्यांनी अथवा शिकाऱ्यांनी तिला दया दाखविणे शक्य नव्हते. अचानक ज्या जगात ती पडली होती, त्यावर तिने फार विश्वास ठेवला असणार. शिवाय स्वतःचे भक्ष्य मिळविण्याची कला तिला अवगत नव्हती ...

फारशी आशा नसूनही तिच्या खोपटाच्या छपरावर मी मांसाचा एक तुकडा ठेवून दिला. पण सकाळपर्यंत तो तसाच तेथे होता.

दुसऱ्या सकाळी तो नाहीसा झाला, पण कोल्हीच्या खोपटाशेजारी चिखलात मांजरीच्या पंजांचे ठळक ठसे होते ...

आम्ही शहरात परतलो.

तरीही जाताना मी मान्या आजीला विनंती केली की, आलीस्काच्या घराच्या छपरावर अन्न ठेवत जा. जर म्हा-तारीने माझी विनंती पूर्ण केली असेल, तर त्यामुळे उन्हाळी निवासींनी टाकून दिलेल्या एखाद्या भटक्या मांजराचाच केवळ फायदा झाला असणार.

बाहेरगावी कामाला जाण्याची पहिलीच संधी मी स्वीकारली. परतल्यावर मी शहरात राहिले. केवळ मार्चच्या अखेरी मान्या आजीच्या दाचावर गेले.

वसंतातील चकचकीत दिवस होता. आठवणींची धार एव्हाना काहीशी बोथट बनली होती. शेवटी काळजातील आठवणी पुसल्या जातात... फक्त पिंजऱ्यापाशी न जाण्याची मी खबरदारी घेतली.

रात्री आलीस्काचे मला स्वप्न पडले. तिच्या आवाजाने मला जाग आली – काजव्याच्या किरकिरीसारखा बारीक. आनंदी आश्चर्य व्यक्त करण्याची तिची ती रीत होती.

मी दिवा पेटवला, वाचत बसले, परत झोपले. सकाळी पाहिले तेव्हा माझा पलंग ज्या खिडकीपाशी होता त्या दिशेने बर्फावर पावलांच्या ठशांची मालिका उमटलेली दिसली. माझ्या काळजाचा ठोका चुकला. पाच छोट्या बोटांचे ठसे आलीस्काच्या ठशांप्रमाणे दिसत होते.

खरेच ती अजून जिवंत होती? खरेच ज्या क्षणी माझा तेथे मुक्काम होता, नेमक्या त्याच वेळी, पूर्वीच्या अंधुक आठवणींपायी मान्या आजीच्या दाचापाशी बिचारी आली असेल का?

शक्यता होती की, दुसऱ्या एखाद्या प्राण्याचे ते ठसे असतील. कारण अंगणाशेजारीच जंगलाची सीमा सुरू होत होती. आणि दुसरा प्राणी असला तर तेच जास्त बरे. कायम एकाकी भटकण्याचे नशीबी आलेला प्राणी जवळपास फिरतोय – माझ्याविना दुसऱ्या कुणालाही नको असलेला हा प्राणी आणि माझ्याकडून कायमचा गमावला गेलेला हा प्राणी – ज्या प्राण्याला मी "सदैव जबाबदार" होते,

कारण प्रथम त्याच्याशी मैत्री करून नंतर त्याचे रक्षण करण्यास मी असमर्थ ठरले होते, असा प्राणी आसपास वावरतोय ही कल्पना भयानक होती.

आलीस्का... अज्ञात ठिकाणाहून आली आणि अज्ञात ठिकाणी निघून गेली. त्या मार्चच्या रात्री भुसभुशीत बर्फावर कुणी स्वतःचे ठसे उमटवले होते हे आता कधीही इतःपर मला समजणार नाही...





मान्नीय वाचक !

प्रस्तुत पुस्तकाबाबतची आपली मते आणि सूचना जाणून घेण्यास आम्हाला आनंद वाटेल.

रशियन आणि सोविएत साहित्याचे तुमच्या मातृभाषेतील अनुवाद आमच्या लोकांच्या संस्कृतीची व जीवनाची सखोल ओळख करून घेण्यास आपल्याला मदत करतील अशी आशा आहे.

आमचा पत्ता: 'रादुगा' प्रकाशन, १७ झूबोवस्की बुलवार, मॉस्को ११९८५९, सोविएत संघ.



